**ग्रामीण निवारा योजना**

राज्यात ग्रामीण/ नागरी भागात आर्थिकदृष्टया दुर्बल/बेघर, अल्पभुधारक घटकांसाठी घरकुल योजना राबविण्याकरीता विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या लाभार्थ्यांच्या अनुदानासाठी रक्कम उपलब्ध करणे.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,

शासन निर्णय क्रमांक: इमाव २००३/प्र.क्र. २०७/मावक-३

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २४ जून, २००३

वाचा :- १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक : घरकुल २०००/प्र.क.३३० /गृनियो-१, दि.२५/९/२००१

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: बीसीएच २०००/७७७/प्र.क्र.१८८/मावक-२, दि.१४/९/२००१.

३) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक बीसीएच २००१/प्र.क्र.१४०/मावक-२, दि.१०/१०/२००२.

४) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: बीजीटी २००३/प्र.क्र.४७/अर्थसंकल्प, दि. ५/४/२००३.

**प्रस्तावना** :- शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक : घरकुल २०००/प्र.क.३३० /गृनियो-१, दि.२५/९/२००१ अन्वये राज्यातील आर्थिकदृष्टया दर्बल घटक, बेघर, अल्पभुधारक लोकांसाठी ग्रामीण भागात ३३००० व ५०००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या शहरात १८००० अशी एकुण ५१००० घरे दरवर्षी बांधण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यापैकी प्रथम टप्प्यात ग्रामीण भागात १६५०० घरे आणि ५०००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या नागरी भागात ९००० घरे बांधण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. प्रस्तुत योजनेची अंमलबजावणी दि.२/१०/२००१ पासून करण्यात आली आहे. या योजनेअंतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या लाभार्थ्यांकरीता बांधकाम खर्चाच्या ३० टक्के अनुदान रक्कम म्हणून प्रत्येकी रु.९००० इतकी रक्कम सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभागाकडून उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- राज्यामध्ये ग्रामीण निवारा योजनेअंतर्गत (क्रिडेट-कम-सबसिडी) आर्थिकदृष्टया दुर्बल घटक, बेघर, अल्पभुधारक लोकांसाठी ग्रामीण भागात व ५०००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या नागरी भागात घरे बांधण्यासाठी सन २००३-०४ या वर्षी विमूक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या लाभार्थ्यांसाठी २२०० इतके लाभार्थी गृहीत धरुन प्रत्येक घरास सरासरी किमंत रु.३०००० पैकी ३० टक्के म्हणून प्रती लाभार्थी रु.९०००/- (रुपये नऊ हजार फक्त ) इतकी रक्कम सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभागाकडून उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. ग्रामीण निवारा योजनेसाठी रु.२,००,००,००० (रुपये दोन कोटी फक्त) इतकी रक्कम २००३-०४ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आली असून शासन ज्ञापन सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : बीजीटी २००३/प्र.क्र.४७/अर्थसंकल्प, दि.५/४/२००३ अन्वये संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागासवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांजकडे सुपूर्द करण्यात आली आहे.

३. या योजनेखाली विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी बांधण्यात येणाऱ्या सदनिकांपोटी विमुक्त जाती भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील लाभार्थ्यांकरीता द्यावयाच्या अनुज्ञेय अनुदानाची एकूण रक्कम ही वि.जा.भ.ज. विशेष मागास प्रवर्गाचे लाभार्थी व बांधकामाची माहिती घेऊन त्यानुसार अनुदान रकमेचे प्रदान संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत जिल्हा ग्रामीण यंत्रणेकडे करण्यात यावी. तसेच लाभार्थी व बांधकामासाठी प्रदान करण्यात आलेले अनुदान इ. बाबींचा सविस्तर अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे ५०,००० पेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या शहरात राबविण्यात येणाऱ्या योजनेकरीता सदर योजनेची रक्कम मंजूर करण्याचे प्रशासकीय आणि वित्तीय अधिकार संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात येत आहेत. या योजनेच्या प्रयोजनासाठी संबंधित शहर ज्या जिल्हयाच्या क्षेत्रामध्ये येते त्या जिल्हयाच्या जिल्हाधिकाऱ्यांना सदर प्रयोजनासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याबाबत होणारा खर्च "मागणी क्रमांक एन - ४ यासाठी होणारा खर्च २२१६, गृहनिर्माण ०३-ग्रामिण गृहनिर्माण -१०४ - सहकारी गृहनिर्माण -पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- सहकारी गृहनिर्माण संस्थांना वित्तीय सहाय्य -४१- सहाय्यक अनुदाने (०१)(९) ग्रामीण निवारा योजना (नि.भ.ज.) (२२१६ १३५ ४ ) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून त्याअंतर्गत सन २००३-०४ या वित्तीय वर्षात केलेल्या आर्थिक तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४४५/०३/व्यय-१४, दि. १२/५/२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

वैअपारकर

**( वै. अ. पारकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा. राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री / राज्यमंत्री (वि.जा.भ.ज.) यांचे खाजगी सचिव
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे/संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी/सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी

सर्व जिल्हाधिकारी/सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिलहा परिषद
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी (गट-अ) जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता)१/२, मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरिक्षा)१/२, मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /सर्व जिल्हा कोषागार अधिकारी/निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (त्यांना विनंती की, यासाठी योग्य ती प्रसिध्दी द्यावी).
निवड नस्ती/ मावक-३